**मंत्रिमंडळाची पायाभूत सुविधा समिती.**

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग,
मंत्रालय, मुंबई – 400 032.
शासन निर्णय क्रमांक: खाक्षेस–1096/प्र.क्र.48/का.1463.
दिनांक :– 6 नोव्हेंबर, 1996.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने डिसेंबर, 1995 मध्ये आपले नवे औद्योगिक, व्यापार व वाणिज्य विषयक धोरण घोषित केले असून त्यामध्ये पायाभूत सोयींवर भर देण्यात आला आहे. राज्य शासनाने पायाभूत सुविधा निर्माण करण्याचे जे प्रयत्न सुरु केले आहेत, त्यास मोठ्या प्रमाणात चालना मिळण्याच्या दृष्टीने खाजगी क्षेत्राच्या सहभागास उत्तेजन देण्याचे ठरविण्यात आले आहे. रस्ते, पूल, उड्डाणपूल, वीज केंद्रे, औद्योगिक वसाहती यासारख्या गोष्टींचे बांधकाम/ व्यवस्थापन खाजगी क्षेत्राकडून झाल्यास हे साध्य होऊ शकेल.

2. सर्वसाधारणपणे पायाभूत सुविधांचे प्रकल्प शासकीय विभागांकडून किंवा सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांकडून हाती घेतले जातात. अलिकडे काही विभागांनी यात खाजगी क्षेत्राला सहभागी करुन घेण्याचा प्रयत्न केला आहे. उदा. वीजनिर्मिती, बंदर विकास आणि रस्ते या क्षेत्रात असे प्रयत्न झाले आहेत. निर्णयाच्या प्रक्रियेस मदत करण्यासाठी खास कार्यपथके नेमून देखील या प्रकल्पांचा प्रगतीचा वेग आवश्यक तेवढा वाढविता आलेला नाही. कारण या प्रकल्पांची वित्तीय, तांत्रिक व कायदेविषयक छाननी करताना कोणते तंत्र वापरावयाचे याचा पूर्वीचा अनुभव नाही आणि विभागांमध्ये तज्ञदेखील उपलब्ध नाहीत. नियोजन, वित्त आणि विधी व न्याय विभागांकडवी नंतर तपासणी करुन देखील काही मुद्दे अनिर्णित राहतात. तेव्हा याबाबतीत तात्काळ निर्णय घेऊ शकेल अशी एक उच्चाधिकार समिती स्थापन करण्याची गरज लक्षात घेऊन, शासनाने मंत्रिमंडळाची पायाभूत सुविधा समिती स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

वरील प्रस्तावना विचारात घेऊन खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

समितीची रचना

| | |
|---|---|
| मा.मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| मा.उप मुख्यमंत्री | सदस्य |
| मा.मंत्री, वित्त | सदस्य |
| मा.मंत्री, उद्योग | सदस्य |
| मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम | सदस्य |
| मा.मंत्री, व्यापार व वाणिज्य | सदस्य |
| मा.मुख्य सचिव | सदस्य |
| मा.प्रधान सचिव (नियोजन) | निमंत्रक |

याखेरीज ठराविक बैठकीसाठी संबंधीत एका किंवा अधिक मंत्र्यांना देखील सदस्य म्हणून निमंत्रित करता येईल

2. प्रधान सचिव, नियोजन, प्रधान सचिव, वित्त आणि प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग हे या समितीचे स्थायी निमंत्रित असतील. इतर अधिकाऱ्यांना आवश्यकतेनुसार निमंत्रित करता येईल.

3. कार्यकक्षा :

सुरुवातीस या समितीचे कार्य औद्योगिक वसाहती, औद्योगिक संकुल (पार्क), बंदरे, विमानतळ रस्ते, पाटबंधारे, परिवहन आणि वीज या सुविधांपुरते मर्यादित राहील.

4. समितीचे अधिकार :

पायाभूत सुविधांसंबंधीच्या प्रकल्पांना मान्यता देणे, प्रस्तावित केलेल्या किंवा राज्य शासनाच्या कोणत्याही विभागाने अथवा सार्वजनिक क्षेत्रांतर्गत उपक्रमाने मंडळाकडे प्रस्तावित केलेल्या पायाभूत सुविधांसंबंधीच्या कोणत्याही बाबीविषयी मार्गदर्शक तत्वे घालून देणे आणि सल्ला देणे.

5. कार्यपध्दती :

समितीपुढे विचारार्थ व निर्णयाकरिता ठेवण्यात येणाऱ्या विषयांसंबंधी एक सविस्तर टिप्पणी संबंधित विभागाने तयार करावी. त्या टिप्पणीच्या प्रती त्या प्रस्तावाशी संबंधित असलेल्या विभागांना देण्यात याव्यात. प्रत्येक प्रस्तावाबाबत वित्त व नियोजन विभागाचा सल्ला घेणे आवश्यक ठरेल. परंतु नेहमीच्या कार्यपध्दतीप्रमाणे नियोजन व वित्त विभाग यांच्या संमतीची किंवा अभिप्रायाची प्रतिक्षा न करता हे दोन्ही विभाग संबंधित टिप्पणीवर आपली मते बैठकीत मांडतील. समितीच्या बैठकीत या टिप्पणीतील प्रस्तावाबाबत तसेच इतर संबंधित विभागाचे अभिप्राय व वित्त व नियोजन विभागाचे अभिप्राय विचारात घेऊन निर्णय घेण्यांत येईल. हा निर्णय अंतिम असेल व तद्नंतर वित्त व नियोजन तसेच इतर कोणत्याही विभागाचे अभिप्राय घेण्याची आवश्यकता राहणार नाही. प्रकल्पांना सत्वर मान्यता मिळावी म्हणून ही कार्यपध्दती निश्चित करण्यात येत आहे. अर्थातच संबंधित विभागाने आपल्या विभागाची टिप्पणी करताना प्रस्तावाच्या सर्व बाबींचा उल्लेख आपल्या टिप्पणीत आणावा, जेणेकरुन समितीस सर्व बाबींविषयी व्यक्त केलेले अभिप्राय विचारात घेऊन निर्णय सत्वर घेणे सुकर होईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दिनेश अफझुलपूरकर )
मुख्य सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. उप मुख्यमंत्री,

मा. मंत्री, वित्त व नियोजन,

मा. मंत्री, उद्योग,

मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम,

मा. मंत्री, व्यापार व वाणिज्य,

मा. राज्यपालांचे सचिव,

मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,

सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,

प्रधान सचिव, वित्त विभाग,

प्रधान सचिव, नियोजन विभाग,

प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग,

सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग,

सर्व मंत्रालयीन विभाग,

नियोजन विभागातील सर्व अधिकारी,

निवड नस्ती, का.1463, नियोजन विभाग.